राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत ग्राम महसूल अधिकारी (तलाठी) प्रशिक्षण कार्यक्रमांच्या खर्चासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण -२०२३/प्र.क्र.२१७/ई-१०**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- २९ मार्च, २०२५

**वाचा:-** समक्रमांकाचे शासन ज्ञापन दिनांक १२.०२.२०२४ व दिनांक २१.०३.२०२४

**प्रस्तावना:-**

राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत "ग्राम महसूल अधिकारी (तलाठी) यांचे पायाभूत प्रशिक्षणासाठी" दि.०१.०७.२०२४ ते दि.२८.१०.२०२४ या कालावधीत झालेल्या प्रशिक्षणाची रु.२००.२३ लक्ष इतकी रक्कम आणि सन २०२१ ते सन २०२४ या कालावधीत झालेल्या प्रशिक्षणाचा रु.१६८.६२ लक्ष इतका निधी उपलब्ध करून देण्याची विनंती विभागीय आयुक्त, अमरावती यांनी शासनास केली होती. त्यानुसार सदर प्रशिक्षणासाठीचा निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत महसूल विभागातील ग्राम महसूल अधिकारी (तलाठी) संवर्गातील कर्मचाऱ्यांना देण्यात येणाऱ्या प्रशिक्षणाकरीता विभागीय आयुक्त, अमरावती (डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती) यांना खालील तक्त्यामध्ये नमूद केल्याप्रमाणे निधी वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.:-

| विभाग | वितरीत केलेला निधी |
|---|---|
| विभागीय आयुक्त, अमरावती (डॉ. पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती) | रु.१,७०,७०,०००/- |
| **एकूण** | रु.१,७०,७०,०००/- |

२. सदरचा मंजूर करण्यात आलेला निधीचा खर्च विभागीय आयुक्त, अमरावती यांनी मुख्य लेखाशीर्ष मागणी क्र.सी-४, २०५२ सचिवालयीन सर्वसाधारण सेवा, (००) (०१) शासकीय कर्मचाऱ्यांचे प्रशिक्षण (२०५२

५२०५) २०-इतर प्रशासकीय खर्च या लेखाशीर्षामधून सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध असलल्या अर्थसंकल्पित निधीमधून भागविण्यात यावा.

३. मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढलेली रक्कम, महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री संबंधितांनी करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

४. संस्थेने वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र महालेखापाल, लेखापरीक्षा महाराष्ट्र १/२ व शासनास तातडीने सादर करावे.

५. सदर शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२/०४/२०२३ प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२०८/२०२५/व्यय-९, दि.२७.३.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२९१७४७४७१११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

SANJAY RAGHUNATH BANKAR

Digitally signed by SANJAY RAGHUNATH BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d74962
9970f349fc6ed260, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E
9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY RAGHUNATH BANKAR
Date: 2025.03.29 17:49:55 +05'30'

**(संजय बनकर)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर

२) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

३) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

४) विभागीय आयुक्त, अमरावती

५) सह सचिव, वित्त विभाग (अर्थ-३), मंत्रालय, मुंबई.

६) कक्ष अधिकारी, (ब-१ / ब-२ / ई-१अ ) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

७) निवडनस्ती (कार्यासन ई-१०) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.